**सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई या कार्यालयाकरिता संगणक सामुग्री खरेदी करण्याच्या रु. ५५,२७,३३४/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा - २०१७/प्र.क्र.९७/का.०७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ जानेवारी, २०२२.

वाचा :-१) सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय ,(अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र. आ. शा. /संगणक मागणी , दिनांक १६.०२.२०२०.
२) विभागाच्या दिनांक २४.०३.२०२१ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, समक्रमांक, दिनांक ३०.०६.२०२१.
४) सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई यांचे पत्र क्र. आ. शा. /संगणक मागणी , दिनांक २१.१२.२०२१.

**प्रस्तावना :-**

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय , अपील शाखा, मुंबई यांनी त्यांचे कार्यालयातील संगणक सामुग्रीचा कालावधी५ वर्षाच्या अधिक झाल्याने व सदर संगणक सामुग्रीमध्ये बिघाड होत असल्याने, कार्यालयीन कामकाजाकरिता संदर्भ १ अन्वये नवीन संगणक सामुग्री खरेदीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २४.०३.२०२१ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. यानुषंगाने संदर्भ क्र. ३ अन्वये दिनांक ३०.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, याबाबत सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय , अपील शाखा, मुंबई यांचेकडून संदर्भ क्र. ४ नुसार संगणक सामुग्री खरेदीचा सुधारीत प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला. त्यानुसार सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा या कार्यालयाकरिता नवीन संगणक सामुग्री खरेदी करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय , (अपील शाखा), मुंबई या कार्यालयाकरिता नवीन संगणक सामुग्री खरेदी करण्याच्या रु. ५५,२७,३३४/- (अक्षरी रु. पंचावन्न लक्ष सत्तावीस हजार तीनशे चौतीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक०१.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार आणि दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार GeM पोर्टलवरुन विहित पध्दतीने करण्यात यावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११७१५२७२८१२१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.01.17 15:29:12 +05'30'

**( नि. वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. संचालनालय, लेखा व कोषागारे, ठाकरसी हाऊस ३, मुंबई पोर्ट ट्रस्ट, २ रा मजला, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टे, मुंबई.
११. सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अपील शाखा), जुनी सा. बां. वि. इमारत पहिला मजला, फोर्ट मुंबई-३२.
१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन-१३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती.